महिला व बाल विकास विभागातील आयुक्त, पुणे यांच्या अधिपतत्या खालील गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या -सन २०१८-१९

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन आदेश क्रमांक : मबाआ -२०१८/प्र.क्र.९५/कार्या -७
मंत्रालय , मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ०४ फेब्रुवारी, २०१९.

संदर्भ :- १) शासन आदेश क्र. मबाआ-२०१७/प्र.क्र.७३/का-७, दिनांक ३१/५/२०१८.

२) शासन आदेश क्र.मबाआ-२०१८/प्र.क्र.३४/का-७, दिनांक ३१/५/२०१८.

३) शासन आदेश क्र.मबाआ-२०१८/प्र.क्र.६९/का-७, दिनांक ६/६/२०१८

-: शासन आदेश :-

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने उक्त अधिनियमाच्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी)/जिल्हा महिला बाल विकास अधिकारी यांच्या विनंतीनुसार पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत कार्यालय | बदलीने पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | श्री.पी.बी. शिर्के | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), मालवणी, मुंबई | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), पुणे-२, जि.पुणे |
| २ | श्रीम.वाय.ए. जोशी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, ठाणे, जि.ठाणे | बाल विकास प्रकल्प अधिकारी, ठाणे-३, जि.ठाणे |
| ३ | श्रीम.एन.सी. महाडीक | परिविक्षा अधिक्षक, पुणे | बाल विकास प्रकल्प अधिकारी, कोल्हापूर |
| ४ | श्री.एस.जी. ठाकरे | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, सिंधुदूर्ग | बाल विकास प्रकल्प अधिकारी, घाटकोपर-२, मुंबई |
| ५ | श्री. विलास मरसाळे | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, चंद्रपूर | महिला व बाल विकास अधिकारी (जि.प.), जिल्हा परिषद, अकोला |

२. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे व आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई यांना कळविण्यात येते की, वरीलप्रमाणे पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांचे अधिनस्त पदस्थापनेचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत. बदली झालेल्या अधिका-यांना कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करावे व सदरील अधिका-यांनी त्यांच्या बदलीच्या पदावर तात्काळ रूजु व्हावे. त्यांचे पुढील वेतन व भत्ते रूजु होणा-या पदावरच काढण्यात येतील याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

३. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिका-यांची पदस्थापना त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना बदलीविषयक फायदे अनुज्ञेय राहणार नाहीत.

४. वरीलप्रमाणे करण्यात येत असलेल्या अधिका-यांची पदस्थापनेच्या आदेशासोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

५. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिका-यांना पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

६. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिका-यांनी बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित अधिकाऱ्यांवर राजकीय दबावाबाबतची ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणुक) नियम १९७९ मधील क्रमांक २३ व क्रमांक ३ (तीन) चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिका-यांना पदस्थापनेने देण्यात येणा-या पदावर रुजू करुन घेताना, ते रजेवर/गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांतील निदेशांचे पालन करावे.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्र.२०१९०२०४१६०१५९३९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने ,**

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.02.05 12:29:53 +05'30'

**(ला.रा.गुजर)**
**शासना चे सह सचिव**

**प्रत,**

१. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
२. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
३. मा.मंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२.
४. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. सचिव(म.व बा.वि),यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मुंबई-३२.
६. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास विभाग
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी , पुणे/ठाणे/कोल्हापूर/अकोला (आयुक्तालय, पुणे यांचे मार्फत)
८. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०० ०५१ (आयुक्तालय, पुणे यांचे मार्फत)
९. महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. सर्व संबंधित अधिकारी (आयुक्तालय, पुणे व आयुक्तालय, नवी मुंबई यांचेमार्फत)
११. निवडनस्ती (कार्यासन-७), महिला व बाल विकास विभाग.